लोकमत

नाशिक | दिवाळी अंक २०१४

छंद माझा वेगळा

मूल्य ५० रुपये





# चित्रसाधक

## त्र्यंबकच्या सिद्धार्थ धारणेचे समृद्ध कलादालन

गाव त्र्यंबकेश्वर. नाव सिद्धार्थ रवींद्र धारणे. बावीसवर्षीय सिद्धार्थ संगणक अभियांत्रिकीचे शिक्षण घेत आहे. पण त्याने जोपासलेल्या छंदामुळे आज तो एक नावाजलेला चित्रकार म्हणून कलाप्रांतात ओळखला जातो. वडील रवींद्र धारणे नावाजलेले छायाचित्रकार आणि आई ज्योतीकडेही कलेचा वारसा. त्यामुळे सिद्धार्थकडे लहानपणापासूनच कलेचे गुण पाझरले. लहान मुले टीव्हीसमोर बसली की त्यांचे आवडते चॅनल असते कार्टून नेटवर्क. कार्टूनच्या विश्वात लहान मुले रममाण होतात. मग त्याला सिद्धार्थ कसा अपवाद असणार? कार्टूनमधील आवडते पात्र रेखाटण्याचा छंद त्याला जडला. टीव्हीवरून कार्टूनचे फोटो काढायचे व त्यावरून त्याने त्याचे चित्र रेखाटायचे, असा दिनक्रम सुरू झाला. त्यासाठी त्याला ड्रॉइंगबुक अपुरी पडू लागली. त्याची कलासाधना सुरू झाली. २००४ साली पुणे येथे संपन्न झालेल्या अखिल भारतीय जलसाहित्य संमेलनासाठी सिद्धार्थच्या वर्गशिक्षिका उषा कन्सारा यांनी एक कविता तयार केली व त्या कवितेच्या विषयानुरूप चित्र सिद्धार्थला काढावयास सांगितले. सदर चित्र संबंधितांकडे पोहोचल्यावर त्यांना ते इतके आवडले की संमेलनाच्या निमंत्रण पत्रिकेवर छापले गेले. तसेच संमेलनानिमित्त प्रसिद्ध करण्यात आलेल्या 'अभियंता मित्र' या जलकाव्य विशेषांकाच्या मुखपृष्ठावरही या चित्राने स्थान मिळविले. सुमारे पाचशे चित्रांमधून सिद्धार्थचे चित्र निवडले गेले, तेव्हा सिद्धार्थ अवघ्या बारा वर्षांचा होता. यशाची पहिली सुरुवात राष्ट्रीय स्तरावरील पुरस्काराने झाली.

वॉटर कलरमधील रिॲलास्टिक प्रकारातील चित्रे हा त्याचा आवडता प्रकार आहे. जाणकारांच्या मते या माध्यमातील असे चित्र काढणारा तो जिल्ह्यातील एकमेव असावा. पोस्टर कलर, ॲक्रालिक कलर, कॅन्व्हॉस पेंटिंग आदिमध्ये त्याने विशेष प्रावीण्य संपादन केले आहे. सन २०१३ मध्ये सुला वाईन यार्डमध्ये त्याच्या चित्रांचे प्रदर्शन झाले. त्यावेळी प्रसिद्ध गायक व संगीतकार श्रीधर फडके व गीतकार सलील कुलकर्णी यांनी सिद्धार्थच्या चित्रांची प्रशंसा केली होती. सिद्धार्थचा त्र्यंबकेश्वर येथील सिड आर्ट स्टुडिओ चित्रांनी भरलेला आहे. त्र्यंबकेश्वरसारख्या छोट्या गावात त्याच्या आर्ट गॅलरीचे काम सुरू आहे. भारतीय क्रिकेट संघाचा खेळाडू सुरेश रैना जेव्हा त्र्यंबकेश्वरला आला होता तेव्हा त्याला सिद्धार्थच्या चित्रांची भुरळ पडली होती. त्यावेळी सिद्धार्थने ब्रह्मगिरी पर्वताचे निसर्गचित्र रैनाला भेट दिले होते. सिद्धार्थची अनेक नामवंत चित्रकारांसमवेत प्रदर्शने झाली आहेत. सिद्धार्थला अनेक पुरस्काराने सन्मानित करण्यात आले आहे. महाराष्ट्र शासनाच्या सामाजिक वनीकरण विभागाच्या वतीने आयोजित पोस्टर पेंटिंग स्पर्धेत पारितोषिक मिळविले.



Lokmat Diwali Special edition, 2014